ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या थकित वीज देयकांच्या अदायगीसाठी सुरु करण्यात आलेल्या **"जीवन संजीवनी"** योजनेस मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-१११९/प्र.क्र.२३६/पापु-०७

## मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- ०३ सप्टेंबर, २०११

**वाचा :** १) शासन निर्णय, पापुवस्ववि. क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.०२०/पापु-०७, दि.१५ जून,२००९

२) शासन निर्णय, पापुवस्ववि. क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१८५/पापु-०७, दि. २३ मार्च, २०१०

**प्रस्तावना**:

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या थकीत असलेल्या वीज देयकांच्या अदायगीसाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये **"जीवन संजीवनी"** योजना सुरू करण्यात आलेली आहे. या योजनेस संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये दि. ३१ ऑक्टोबर, २०१० पर्यंत मुदतवाढ देखील दिलेली होती. या योजनेस मिळालेला चांगला प्रतिसाद तसेच विहित कालावधीत ज्या ग्राहक संस्थांना या योजनेमध्ये सहभागी होता आले नाही, अशा ग्राहकसंस्थांना या योजनेमध्ये सहभागी व्हावे यासाठी योजनेस पुन्हा मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबी विचारात घेऊन ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या थकीत असलेल्या वीज देयकांच्या अदायगीसाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आलेल्या **"जीवन संजीवनी"** योजनेस, दि. ३१ मार्च, २०१२ पर्यंत, मुदतवाढ देण्यात येत आहे. ज्या ग्राहक संस्थांना, या योजनेमध्ये विविध कारणांमुळे भाग घेता आला नाही, अशा सर्व ग्राहक संस्थांना, या योजनेमध्ये आता सहभागी होता येईल.

२.  "जीवन संजीवनी" योजनेमध्ये सहभागी होण्यासाठीच्या दि. १५ जून, २००९ च्या शासन निर्णयान्वये विहित अटी व शर्तीमध्ये कोणताही बदल होणार नाही. दि. १५ जून, २००९ चा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०६१५१४१३४३००१ असा आहे.

३.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९०३१२४३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(र. अं. खडसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,
मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
विधान सभा सदस्य (सर्व )
विधान परिषद सदस्य (सर्व )
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय मुंबई
विभागीय आयुक्त (सर्व)
पालक सचिव (सर्व )
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (सर्व)
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व )
कार्यकारी अभियंता, ग्रा. पा. पु. विभाग,जिल्हा परिषद (सर्व )
महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा परिक्षा)
महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परिक्षा)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई
उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा (सर्व)
जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भू.स. वि. यंत्रणा (सर्व)
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
तहसीलदार (सर्व)
गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई
मंत्रालयातील इतर सर्व विभाग,
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
निवडनस्ती, कार्यासन क्रमांक पापु-०७.